२०११०३१७१७२१३३००१

**पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण**
तांत्रिक सल्लागार समिती गठीत करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीसीएन ३००८/५६/प्र.क्र.४९/०८/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :- २२ फेब्रुवारी, २००८**

**वाचा :-** (१) शासन निर्णय क्रमांक पीसीएन १६९७/१६९१/प्र.क्र.२२४/९७/नवि-२२, दिनांक १४ जानेवारी, १९९८.
(२) शासन निर्णय क्र.पीसीएन २००४/४०७५/प्र.क्र.३२/नवि-२२, दि.२४ मार्च,२००६
(३) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे क्रमांक विप्रा/तांत्रिक सभा/२०४, दिनांक ८ जानेवारी,२००८ व त्यासोबतचा प्राधिकरण सभा ठराव.

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणास नियोजन विकास विषयक तांत्रिक सल्ला देण्यासाठी उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ अन्वये तांत्रिक सल्लागार समिती नेमण्यात आली होती. सदर समितीचा कार्यकाल दिनांक ५/११/२००७ रोजी संपुष्टात आला. त्यानंतरदिनांक १५/१२/२००७ रोजी झालेल्या २७४ व्या प्राधिकरण सभेमध्ये नव्याने तांत्रिक समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यास अनुसरुन पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणासाठी तांत्रिक सल्लागार समिती नव्याने गठीत करण्यासाठी संदर्भाधीन क्र.३ च्या प्रपत्रान्वये मु.का.अ.,पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम,१९६६ चे कलम १०(१) मधील अधिकाराचा वापर करुन शासन याव्दारे नवनगर विकास प्राधिकरणास नियोजन व विकास विषयक तांत्रिक सल्ला देण्यासाठी तांत्रिक सल्लागार समिती दिनांक ६/११/२००७ पासून पुनर्गठीत करण्याच्या प्राधिकरणाच्या प्रस्तावास मंजुरी देत आहे. सदर समितीमध्ये पुढील सदस्यांचा समावेश असेल.

(१) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे — अध्यक्ष

(२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग, पुणे — सदस्य

(३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे — सदस्य

(४) शहर अभियंता, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी,पुणे — सदस्य

(५) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी,भोसरी — सदस्य

(६) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, चिंचवड — सदस्य

(७) उपसंचालक, नगर रचना विभाग, पुणे — सदस्य

(८) उपसंचालक, नगररचना विभाग, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका — सदस्य

(९) कार्यकारी अभियंता (अ), पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, — सदस्य-सचिव

०२. सदर तांत्रिक समिती ३ वर्षाच्या कालावधीसाठी अथवा प्राधिकरणावरील कार्यकारी मंडळाची पुनर्रचना होईपर्यन्त यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त अस्तित्वात असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

**( फ. ब. खान )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

(१) विभागीय आयुक्त,पुणे तथा अध्यक्ष, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे,
(२) संचालक, नगररचना व मुल्यनिर्धारण विभाग, पुणे,
(३) उपसचिव (नगररचना), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
(४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
(५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे
(६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, पुणे
(७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, चिंचवड, पुणे,
(८) शहर अभियंता, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे,
(९) उपसंचालक, नगररचना, पुणे,
(१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, भोसरी, पुणे,
(११) कार्यकारी अभियंता (अ), पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
(१२) नगररचना अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे,
(१३) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२